वन विभागाचे संगणकीकरण कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र वन विभागाच्या क्षेत्रिय अधिकारी/ कर्मचारी यांना **CUG (Closed User Group) Plan** पुरविणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- एफएलडी-२०१९/प्र.क्र.२५८/फ-१०**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- २१/१०/२०२०

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांक एमएससी-२००४/प्र.क्र.२१/फ-२, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई, दिनांक ०५/१०/२०११.

२) शासन निर्णय क्रमांक एमएससी-२००४/प्र.क्र.२१(भाग-३)/फ-२, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई, दिनांक ०४/०८/२०१४.

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१५/आयसीटी/एफ.नं.सीयुजी-१/८०९/२०१९-२०, दिनांक १०/०२/२०२०.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या ई-प्रशासन धोरणाच्या धर्तीवर सन-२०११ मध्ये राज्य शासनाने ई-प्रशासन धोरण जाहीर केले आहे. सदर धोरणांतर्गत, शासकीय प्रशासन अधिकाधिक लोकाभिमुख, पारदर्शी, जबाबदार व गतिमान करण्याच्या दृष्टीने अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा अधिकाधिक वापर करणे अपेक्षित असून यात माहिती तंत्रज्ञानाचे महत्व अनन्यसाधारण असे आहे. सदरहू धोरणास अनुलक्षून राज्यातील वन विभागाचे संगणकीकरण करणेकरीता ICT प्रकल्प राबविण्याचा निर्णय संदर्भ क्र.१ येथे नमूद शासन निर्णय आणि संदर्भ क्र.२ येथे नमूद सुधारित शासन निर्णयान्वये घेण्यात आला. या प्रकल्पांतर्गत प्रथम टप्प्यात संरचणागत कामे जसे; क्षेत्रिय कार्यालयात सबळ आणि सक्षम क्षमतेची Connectivity देणे करिता LAN/WAN, प्रकल्पाचे पर्यवेक्षण आणि सनियंत्रणाकरिता IT Cell/कमांड कंट्रोल रूम स्थापित करणे, कॉल सेंटर कार्यान्वित करणे इत्यादी महत्वपूर्ण कामे करण्यात आली. पुढील टप्प्यात विविध वानिकी प्रणाली (Apps) विकसित करून कार्यान्वित करण्याची कार्यवाही प्रगती पथावर असून मोठ्या प्रमाणात Online माहिती संकलित करण्यात येत आहे .

सदरहू प्रकल्पाचा मुख्य उद्देश हा तंत्रज्ञानाचे आधारे शासकीय माहितीचे आदान प्रदान करणे हा आहे. शासकीय कामकाजात क्षेत्रिय स्तरावरून निर्मित आणि संकलित डाटा/दस्तऐवज Voluminous Hard कॉपी मध्ये सादर केले जाते किंवा पाठविले जाते. त्यात काळानुरूप बदल करून उपलब्ध अत्याधुनिक माहिती तंत्रज्ञानाचा वापर करून ही माहिती ई-स्वरुपात (इलेक्ट्रॉनिक) पाठविणे सहज शक्य आहे. हीच बाब लक्षात घेऊन सर्व क्षेत्रिय कर्मचा-यांना PDA (Personal Digital Assistance) पुरविण्याचा निर्णय घेण्यात येऊन त्याची कमाल किंमत एकूण रु. ८०००/- (सर्व

करासह) ठरविण्यात आली होती. तसेच संदर्भ क्र.२ येथे नमूद सुधारित शासन निर्णयान्वये सदर PDA चे आयुष्यमान (Life) ३ वर्ष एवढे निश्चित करण्यात आले होते. आजतागायत एकूण ८,६०२ PDA वितरित करण्यात आले आहेत.

तसेच विभागात IT infrastructure उभारताना Communication Network करिता BSNL मार्फत आवश्यक कार्यवाही करणेबाबत शासन निर्णय दिनांक ०५/१०/२०११ व ०४/०८/२०१४ मध्ये नमूद असल्याने राज्यात संप्रेषण जाळे उभारणेसाठी BSNL यांची सेवा घेण्यात आलेली आहे. तसेच PDA द्वारे माहितीचे आदान प्रदान करणेसाठी रू.१७०/- प्रती SIM प्रती महिना प्रमाणे BSNL कडील SIM चा वापर करण्यात येत असून तो आजतागायत कार्यरत आहे. या अंतर्गत सन २०१३-१४ ते सन २०१५-१६ या कलावधीत एकूण ८,६१५ SIM वितरित करण्यात आले होते.

उपरोक्त सर्व कार्यवाही तत्कालीन परिस्थितीच्या अनुषंगाने करण्यात आली होती. सन-२०१४ मध्ये ५ वर्षापेक्षा अधिक कालावधी झाल्याने PDA चे आयुष्यमानही संपुष्टात आले आहे. तथापि, बदलत्या परिस्थितीत Connectivity Access अपुरा असल्याने अनेक प्रकारच्या स्थानिक तसेच तांत्रिक अडचणी येत असल्याच्या तक्रारी क्षेत्रिय स्तरावरून प्राप्त होत आहेत. क्षेत्रिय स्तरावर वितरित करण्यात आलेले व कालबाह्य झालेले PDA आणि BSNL कडील अपुरी व खंडित Connectivity मुळे data uploading मध्ये अडथळा निर्माण होत आहे. याकारणास्तव ई-प्रशासनाचा मूळ उद्देश सफल होत नाही. तसेच काही ठिकाणी BSNL चे नेटवर्क उपलब्ध होत नसल्याचेही निदर्शनास आले आहे. मोबाईल पंजीकरण, पर्यवेक्षण व सनियंत्रणाची कार्यपद्धती केंद्रीकृत असल्याने (प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे कार्यालय स्तरावर) अनेक अडचणी प्रस्थापित कार्यपद्धतीत निर्माण झालेल्या आहेत.

उपरोक्त परिच्छेदात नमूद केल्यानुसार PDA/ SIM चा जास्तीत जास्त वापर करण्यासाठी डाटा संकलनाची प्रक्रिया अधिक सुलभ आणि वेगवान करणेसाठी एकीकृत मोबाईल प्रणाली (Integrated Mobile App) कार्यान्वित करणे गरजेचे आहे, शिवाय माहिती तंत्रज्ञानात दिवसेंदिवस होत चाललेल्या बदलाचा विभागाच्या कार्यप्रणालीवर कोणताही फरक पडू नये म्हणून डाटा अपलोडिंग गतिमान करणेसाठी, SIM च्या धारकाबाबत (Ownership) एकवाक्यता व सुसूत्रता आणण्याकरिता PDA आणि SIM चे मालकत्व अधिकारी/ कर्मचारी यांचेकडे राहणे गरजेचे आहे. PDA मध्ये सद्यस्थितीत लागणारे Nano सिम/Micro सिम बदलताना केंद्रीय कार्यालयाची परवानगी घ्यावी लागते, त्यामुळे श्रम व वेळ वाया जातो. ही बाब लक्षात घेवूनच वन विभाग स्तरावर याची जबाबदारी देण्याचे तसेच डाटा अपलोडिंग साठी लागणारे नेटवर्क निवडण्याची मुभा कर्मचा-यांना देणेबाबत प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.३ येथे नमूद पत्रान्वये प्रस्तावित केले आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केलेला प्रस्ताव विचारात घेऊन वन विभागाचे संगणकीकरण कार्यक्रमांतर्गत Communication

Network करीता कायमस्वरुपी उपाययोजना करणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती व याबाबत शासनाव्दारे खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

वन विभागाचे संगणकीकरण कार्यक्रमांतर्गत Communication Network करीता Telecom Service Provider ची नेमणूक करणेच्या अनुषंगाने पुढील मार्गदर्शक तत्वे अवलंबिण्यात यावी:-.

a. सर्व PDA कालबाह्य झाल्याने बदलणे गरजेचे आहे. पुन्हा नवीन PDA (Personal Digital Assistance) शासकीय अनुदानातून पुरविणे ही अतिशय खर्चिक बाब असल्याने नव्याने PDA पुरविण्यापेक्षा अधिकारी/कर्मचारी यांनी त्यांचेकडे असलेले स्वत:चे स्मार्ट फोन वापरावेत.

b. त्यावर स्थानिकरित्या उपलब्ध TSP (Telecom Service Provider) सेवापुरवठादाराकडून connectivity करिता SIM वापरण्यास परवानगी देण्यात येत आहे. जेणेकरून सतत आणि अखंडित तसेच सक्षम Connectivity ची सोय डाटा अपलोडिंगसाठी उपलब्ध होईल. त्यामुळे यापूर्वी शासनामार्फत पुरविण्यात आलेले BSNL कडील SIM बंद करण्यात येत आहे.

c. पर्यवेक्षण आणि सनियंत्रणाची स्थापित कार्यपद्धती केंद्रीकृत असल्याने PDA/SIM चा पूर्ण वापर सुनिश्चित करणे जिकरीचे झाले होते. ह्याचे विकेंद्रीकरण करणे अत्यंत गरजेचे आहे. त्या अनुषंगाने सध्यास्थितीतील केंद्रीय पद्धतीने BSNL कडील SIM चा वापर बंद करून वनपरिक्षेत्र अधिकारी यांचे स्तरावर वापर करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे. त्याकरिता क्षेत्रिय स्तरावरील अधिकारी/ कर्मचारी यांना कार्यालयीन उपयोगितेकरीता सदर SIM च्या वापरासाठी मासिक खर्च रु.१७०/- प्रमाणे संबंधित वन परिक्षेत्र अधिका-यामार्फत शासन अदा करेल.

d. संबंधित क्षेत्रिय अधिकारी/कर्मचारी सेवेत रुजू होताच त्यांना स्वत:चा मोबाईल क्रमांक आणि IMEI क्रमांक विभागाचे संकेत स्थळावर नोंदवावेत आणि त्यास संबंधित वनपरिक्षेत्र अधिकारी व सहायक वनसंरक्षक वरिष्ठ अधिका-यांनी Digitally Endorse करावा व डाटा अपलोड करावा. तसेच कर्मचा-याची बदली झाल्यास, बदली झालेल्या कर्मचा-यांनीच स्वत:चा मोबाईल क्रमांक Register करणे व De-register करण्याची जबाबदारी संबंधित कर्मचारी व वनपरिक्षेत्र अधिकारी यांची राहील.

e. त्यावर संबंधित कर्मचारी/अधिकारी यांचे मार्फत डाटा अपलोड करणे तसेच या पुढील पर्यवेक्षण आणि संनियंत्रण करण्याची जबबदारी सुद्धा संबंधित वनपरिक्षेत्र अधिकारी/ सहायक वनसंरक्षक/ उपवनसंरक्षक यांची असेल.

f. वापरकर्त्यास मासिक खर्च एकूण रु. १७०/- देणे प्रस्तावित केले आहे. सदरहू देयक अदा करतांना संबंधित (वनपरिक्षेत्र अधिकारी/ सहायक वनसंरक्षक) यांनी वापर सुनिश्चित केल्यानंतरच देयक अदा करावे.

g. विभागीय स्तरावर SIM चा पूर्ण वापर तसेच पर्यवेक्षण व सनियंत्रणाची जबाबदारी संबंधित उपवनसंरक्षकाची राहील. त्यांनी SIM वापराबाबतचा अहवाल संकलित करून संबंधीत मुख्य वनसंरक्षक यांना सादर करावा.

h. वन वृत्त स्तरावर PDA/SIM चा पूर्ण वापर तसेच पर्यवेक्षन व सनियंत्रणाची जबाबदारी संबंधित मुख्य वनसंरक्षकाची राहील. त्यांनी सर्व विभागीय कार्यालयाकडून संकलित अहवाल दर महिन्याला प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहती, तंत्रज्ञान व धोरण), नागपूर यांना सादर करावा.

i. सदर कार्यपद्धतीचे एक वर्षानंतर मूल्यमापन करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा, जेणेकरुन पुढील कार्यवाही निश्चित करता येईल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२०१०२११४५६४६३५१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2020.10.21 14:58:18 +05'30'

**( अरविंद आपटे )**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
३) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
६) संचालक, एम.आर.एस.सी, नागपूर
७) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वन विकास महामंडळ, नागपूर.
१०) महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक/मुख्य वनसंरक्षक /वनसंरक्षक/उपवनसंरक्षक
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१४) नॅशनल इन्फोर्मेटीक सेंटर,११ वा मजला, नविन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई -३२

१५) व्यवस्थापकीय संचालक, भारत संचार निगम लिमिटेड, मुंबई

१६) सह संचालक, कोषागार कार्यालय, नागपूर

१७) राष्ट्रीय सूचना केंद्र, नागपूर

१८) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव

१९) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव

२०) प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहायक

२१) वन विभागातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२२) निवडनस्ती फ-१० कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.